नवीन जलसंधारण उपचार बांधकाम हाती घेताना आधुनिक तंत्रज्ञानाचे वापर करण्यासाठी समिती गठीत करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण-२०२४/प्र.क्र.१८३/जल-१**
मंत्रालय, मुंबई -४०००३२
दिनांक: ०३ जुलै, २०२४.

**प्रस्तावना-**

मृद व जलसंधारण विभाग दि. ३१ मे २०१७ च्या शासन निर्णयान्वये नव्याने निर्माण झालेला असुन विभागाची कार्यकक्षा ० ते ६०० हे. इतकी आहे. राज्यातील दुष्काळी परिस्थितीवर कायमस्वरुपी उपाययोजना करण्याच्या दृष्टीने लघुसिंचन योजना अत्यंत उपयोगी असल्याने ० ते ६०० हेक्टर सिंचन क्षमता असलेल्या लघु सिंचन योजनांचे बांधकाम, देखभाल दुरुस्ती व व्यवस्थापन मृद व जलसंधारण विभागामार्फत करण्यात येतात. मृद व जलसंधारण विभागांतर्गत राबविण्यात येणारे जलसंधारण उपचार बांधकाम हे छोट्या व विखुरलेल्या स्वरुपाचे आहेत. मृद व जलसंधारण विभागामार्फत सिमेंट नाला बांध, गेटेड साठवण बंधारा, पाझर तलाव, साठवण तलाव, लघु सिंचन तलाव, को.प. बंधारा, उपसा सिंचन योजना, गाव तलाव व इतर जलसंधारण बांधकाम हाती घेतले जातात.

जलसंवर्धनाची निकड लक्षात घेऊन राज्यात वेगवेगळ्या पातळीवरून जलसंवर्धनाची विविध प्रकारची कामे सामाजिक संस्था, शासकीय यंत्रणा व लोकसहभागातून मोठ्या प्रमाणात हाती घेण्यात येत आहेत. विभागाकडून राज्यातील पावसाचे असमान/कमी वितरण व पावसाचा लहरीपणा यावर मात करत पाण्याचे सुयोग्य नियोजन करून शाश्वत शेती करण्याचे उद्दिष्ट निश्चित करण्यात आले आहे. सदर उद्दिष्ट साध्य करण्यासाठी पारंपारिक जलसंवर्धन उपचारांसोबतच कमी खर्चात जास्तीत जास्त पाणी साठवण्यासाठी (Least Cost Solution) आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करून नवनवीन जलसंवर्धन उपचार प्रस्तावित करण्यात येत आहेत.

सबब पारंपारिक जलसंधारण उपचार बांधकामांसोबतच नवीन तंत्रज्ञानाचे जलसंधारण उपचार हाती घेणे काळाची गरज आहे. सद्यस्थितीत विभागाकडे विविध नावीन्यपूर्ण जलसंधारण उपचार बांधकामांचे प्रस्ताव राबविण्याबाबचे प्रस्ताव प्राप्त होत आहेत. सदर प्रस्तावांना मान्यता देणेपूर्वी प्रस्तांवाची तांत्रिक तपासणी होणे आवश्यक आहे. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे छाननी समिती गठीत करण्याचा पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:**

विभागाकडे विविध पारंपारिक जलसंधारण उपचार बांधकामांसोबतच नवीन तंत्रज्ञानाचे जलसंधारण उपचार राबविण्याबाबचे प्रस्ताव प्राप्त होत आहेत. सदर प्रस्तावांना मान्यता देणेपूर्वी प्रस्तांवाची तांत्रिक तपासणी खालीलप्रमाणे गठीत केलेली समिती करेल व समिती आपला छाननी

अहवाल प्रस्ताव प्राप्त झालेपासून १ महिन्याच्या आत शासनास सादर करेल तद्नंतर असे प्रस्ताव हाती घेण्याबाबत निर्णय शासन स्तरावरून घेण्यात येईल.

सदर छाननी समितीची रचना खालीलप्रमाणे असेल-

| अ.क्र. | पदनाम | समितीतील पदनाम |
|---|---|---|
| १ | अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, आयुक्त कार्यालय, मृद व जलसंधारण विभाग, छ. संभाजीनगर | अध्यक्ष |
| २ | अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण विभाग, प्रादेशिक क्षेत्र, नागपूर. | उपाध्यक्ष |
| ३ | अधीक्षक अभियंता तथा उपसचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४ | प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, ठाणे | सदस्य |
| ५ | प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे | सदस्य |
| ६ | कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य सचिव |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०७०३१५४६३७१६२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAKASH NILKANTHRAO PATIL

Digitally signed by PRAKASH NILKANTHRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT,
2.5.4.20=a7dc90f966c671a9acd0a599ee5fc497272e775d33643b14725c6a77432c673f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F1EC28A96B2A52575AE4CCCA512D1723F249D503AE71CF458BA4863AACFFBF62, cn=PRAKASH NILKANTHRAO PATIL
Date: 2024.07.03 15:57:38 +05'30'

**( प्र. नि. पाटील )**
**कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री, अपर मुख्य सचिव.
३. विरोधी पक्षनेते, विधान परिषद/विधानसभा, विधान सचिवालय, विधान भवन, मुंबई.
४. सर्व माननीय संसद सदस्य, विधिमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५. सर्व. मंत्री/राज्यमंत्र्यांचे खाजगी सचिव.

६. मुख्य सचिवांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य.
७. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सर्व मंत्रालयीन विभागांचे सचिव.
८. अपर मुख्य सचिव (मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक.
९. महालेखापाल-१ (लेखा व परवाना) (लेखापरीक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०.विभागीय निदेशक, केंद्रीय भूमीजल बोर्ड, भारत सरकार.
११.आयुक्त, मृद व जलसंधारण आयुक्तालय, छत्रपती संभाजीनगर.
१२.आयुक्त, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
१३.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, छत्रपती संभाजीनगर.
१४.सर्व जिल्हाधिकारी.
१५.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१६.अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१७.अतिरिक्त आयुक्त व मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण विभाग, प्रादेशिक क्षेत्र, सर्व.
१८. प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, सर्व.
१९.प्रादेशिक दक्षता गुणनियंत्रण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, सर्व.
२०.जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, सर्व.
२१.जिल्हा जलसंधारण अधिकारी, (ल.पा.) जिल्हा परिषद, सर्व.
२२.निवड नस्ती (जल-१)